**राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवर संशोधन अधिकारी हे पद दोन वर्षांसाठी निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आरएजे- २०१६/२३०/प्र.क्र.८९/२०अ,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- १९.०५.२०१७

वाचा :- १) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.आएजे-१०११/मुमंस/प्र.क्र.५७/२०११/२०अ, दिनांक ३१/०१/२०१२.
२) राज्यपांलाचे सचिव यांचे पत्र क्र.रास/आस्था/ आ.वि. २०१६/१४५० दिनांक ३०/४/२०१६.
३) राज्यपांलाचे सचिव कार्यालयाचे पत्र क्र. रास/ आस्था सं.अ./२०१७/५०६, दिनांक २२/२/२०१७
४) शासन पत्र वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.५३/१६/आ.पु.क. दिनांक २८/०२/२०१७

प्रस्तावना :-

अनुसुचित क्षेत्र व अनुसुचित जनजाती यांचे प्रशासन व नियंत्रण यांच्याशी निगडित कामकाज हाताळण्यासाठी जनजाती मंत्रालय, भारत सरकार यांच्या सूचनेनुसार राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवर संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पुढील ४ पदे निर्माण करण्यात आली आहेत:-

| अ.क्र. | पदाचे नाव | संख्या | विद्यमान वेतनश्रेणी | ग्रेडवेतन |
|---|---|---|---|---|
| १ | मानववंशशास्त्रज्ञ | १ | १५६००-३९१०० | ६६००/- |
| २ | विधी अधिकारी | १ | १५६००-३९१०० | ६६००/- |
| ३ | अधीक्षक | १ | ९३००-३४८०० | ४४००/- |
| ४ | सहायक | १ | ५२००-२०२०० | २४००/- |
| | **एकूण** | **४** | | |

२. वरील पदांपैकी मानववंशशास्त्रज्ञ व विधी अधिकारी ही पदे योग्य व्यक्तीच्या उपलब्धते अभावी रिक्त आहेत. सदर पदांपैकी मानववंशशास्त्रज्ञ हे पद तात्पुरत्या स्वरूपात रद्द करून त्याऐवजी संशोधन अधिकारी हे पद दोन वर्षाच्या कालावधीसाठी निर्माण करण्याचा व त्यावर रू. ७५०००/- प्रति माह मानधनावर नियुक्ती करण्याचा प्रस्ताव राज्यपालांचे सचिव कार्यालयाने संदर्भ क्र.२ व ३ येथील पत्रांन्वये सादर केला होता.

३. राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्यपांलाचे सचिव कार्यालयातील अदिवासी कक्षासाठी मंजूर मानववंशशास्त्रज्ञ हे पद तात्पुरत्या स्वरूपात रद्द

करण्याच्या अटीच्या अधीन राहून संशोधन अधिकारी हे पद दोन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्याचा प्रस्ताव उच्च स्तरीय समितीसमोर ठेवण्यात आला होता. सदर प्रस्तावास दिनांक २३ फेब्रुवारी , २०१७ रोजी झालेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या बैठकीत मान्यता देण्यात आल्याचे वित्त विभागाने संदर्भीय क्र. ४ च्या पत्रान्वये कळविले आहे.

**शासन निर्णय :-**

दिनांक २३ फेब्रुवारी , २०१७ रोजी झालेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या बैठकीत, समितीने केलेल्या शिफारशीनुसार, राज्यपालांचे सचिव कार्यालयातील अदिवासी विकास कक्षामध्ये मंजूर मानववंशशास्त्रज्ञ ( वेतनश्रेणी १५६००-३९१०० + ग्रे.वे.६६०० ) हे पद तात्पुरत्या स्वरुपात रद्द करून त्याऐवजी संशोधन अधिकारी हे पद दोन वर्षासाठी निर्माण करण्यास व या पदावर कंत्राटी तत्वावर रू. ७५०००/- प्रति माह मानधनावर नियुक्ती करण्यास यान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च मागणी "क्रमांक ए-१, २०१२ राष्ट्रपती, उपराष्ट्रपती / राज्यपाल संघराज्य क्षेत्राचे प्रशासक, ०३ राज्यपाल/ संघराज्यक्षेत्र प्रशासक ०९०- सचिवालय (००) (००), (०१) सचिवालय (२०१२ - ००१४ )" या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागाविण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय उच्च स्तरीय सचिव समितीच्या दिनांक २३/०२/२०१७ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २११/व्यय-४, दि. २१.०४.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५२०१२४११०९५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shubhangi Suhas Agashe

Digitally signed by Shubhangi Suhas Agashe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=172255ef061cede931f38d47a523ff38ab66ea8d7033b5f7ebcf3045a75b6735, cn=Shubhangi Suhas Agashe
Date: 2017.05.20 12:47:50 +05'30'

**( शु. सु. आगाशे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५.

**प्रत,**

१. राज्यपालांचे परिवार प्रबंधक, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुबई /महाराष्ट्र-२, नागपूर.

३. महालेखापाल ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र-१, मुबई /महाराष्ट्र-२, नागपूर.

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

६. वित्त विभाग कार्यासन सेवा-५/वित्तीय सुधारणा-१ /व्यय-४/अर्थसंकल्प-२/१४, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७. निवडनस्ती (दोन प्रती ).